# महाराष्ट्र शासन

तत्काळ/स्मरणपत्र-२

क्र.उसप्र-१३१८/प्र.क्र.७८/का.१४
सामान्य प्रशासन विभाग, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ०१.१२.२०१८

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय-** "प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, नाशिक" हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.
**संदर्भ-** १ समक्रमांकित दि.२५.०४.२०१८ चे पत्र.
२. समक्रमांकित दि.२४.०५.२०१८ चे स्मरणपत्र

महोदय/महोदया,

उपरोक्त विषयाच्या अनुषंगाने संदर्भाधिन पत्रान्वये "प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, नाशिक" हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत मंत्रालयीन विभागातील सह/उप सचिव या संवर्गातील अधिकाऱ्यांकडून संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये व संदर्भ क्र.२ येथील स्मरणपत्रान्वये इच्छुकता मागविण्यात आल्या होत्या. मात्र सदर पदासाठी इच्छुकता प्राप्त झाल्या नाहीत.

०२. यास्तव, "प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, नाशिक" हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत मंत्रालयीन विभागातील सह/उप सचिव या संवर्गातील अधिकाऱ्यांकडून दि.०७.१२.२०१८ पर्यंत पुन्हा इच्छुकता मागविण्यात येत आहे. तरी आपल्या विभागातील प्रतिनियुक्तीसाठी इच्छुक अधिकाऱ्यांची माहिती दि.०७.१२.२०१८ पर्यंत पाठवावी. आपल्या विभागातून प्रतिनियुक्तीसाठी कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास निरंक असेही कृपया कळविण्यात यावे. तसेच इच्छुक अधिकाऱ्यांनी आपल्या संबंधित विभागाकडे केलेल्या अर्जाची एक आगाऊ प्रत सा.प्र.वि./का-१४ यांना परस्पर सादर करावी.

०३. इच्छुक अधिकाऱ्यांची माहिती सोबतच्या विवरणपत्रामध्ये सादर करावी. तसेच प्रतिनियुक्तीसाठी निवड झाल्यास सदर अधिकाऱ्यांना संबंधित विभागाने कार्यमुक्त करणे बंधनकारक राहील, याची नोंद घ्यावी.

०४. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१२०११७२६२१५४०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला विश्वासू,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.12.01 17:32:42 +05'30'

(ग.भि.गुरव)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत-** विवरणपत्र

**प्रत-** निवडनस्ती

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>मुद्दा</th><th>तपशिल/अभिप्राय</th></tr>
<tr><td>१</td><td>अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव</td><td></td></tr>
<tr><td>२</td><td>जन्मदिनांक</td><td></td></tr>
<tr><td>३</td><td>शैक्षणिक अर्हता</td><td></td></tr>
<tr><td>४</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>५</td><td>मागील ३ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.)</td><td></td></tr>
<tr><td>६</td><td>मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>७</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>८</td><td>संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा)</td><td><table>
<tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td rowspan="3">पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण</td></tr>
<tr><td></td></tr>
<tr><td></td></tr>
<tr><td colspan="2">एकूण कालावधी</td></tr>
</table></td></tr>
<tr><td>९</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ५ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>१०</td><td>संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय?</td><td></td></tr>
<tr><td>११</td><td>प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे.</td><td></td></tr>
</table>